**आदिवासींना कर्जमाफी योजना.**

**शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांचेमार्फत राबविण्यात येणा-या स्वयंरोजगाराच्या योजनांची कर्जमाफी.**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग,

**शासन निर्णय क्रमांक-कमायो-२००९/प्र.क्र.५२/का.३**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- ८ डिसेंबर, २००९.

**प्रस्तावना** :-शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक या महामंडळाची निर्मिती शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग,क्र.आविम-२३९६/४५/प्र.क्र.३९/का-३, दिनांक ९ डिसेंबर, १९९८ अन्वये करण्यात आली असून सदर महामंडळाचे कंपनी कायदा,१९५६ नुसार जानेवारी, १९९९ मध्ये नोदंणी करण्यात आली आहे. शबरी महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रुपये १००.०० कोटी असून ५१ टक्के राज्य शासन तर ४९ टक्के केंद्र शासनाकडून उभारावयाचे आहे. त्यानुसार राज्य शासनाकडून रुपये २८.२३ कोटी व केंद्र शासनाकडून रुपये ०.५२ कोटी भाग भांडवल उपलब्ध करुन देण्यात आले आहे. या महामंडळामार्फत स्वयंरोजगार निर्मितीसाठी कर्ज योजना राबविण्यात येतात. या कर्ज योजनांसाठी ७५ टक्के कर्ज हिस्सा हा राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून ४ व ६ टक्के व्याजावर उपलब्ध होते. योजना राबविताना शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाकडून मार्जिन मनी म्हणून १५ टक्के हिस्सा व लाभार्थी हिस्सा १० टक्के अशा रितीने कर्ज आदिवासी लाभार्थ्यांना स्वयंरोजगार निर्मितीसाठी उपलब्ध करुन देण्यात येते. तसेच काही योजनांना राष्ट्रीयकृत बँकाकडून देखिल अर्थसहाय्य करुन योजना राबविण्यात येतात. सदरचे कर्ज हे लाभार्थ्यांना ६ ते ८ टक्के व्याज दराने उपलब्ध करुन देण्यात येते. सदर कर्ज व्याजासह पाच वर्षाच्या कालावधीकरीता असून त्याच कालावधीत ते वसूल करण्यात येते. लाभार्थ्यांकडून कर्जाची वसूली टप्याटप्याने झाल्यानंतर राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली तसेच राष्ट्रीयकृत बँक व शबरी महामंडळ यांच्याकडून उपलब्ध झालेल्या कर्जाची परतफेड सव्याज केली जाते.

शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांचेमार्फत स्वयंरोजगारासाठी आदिवासी लाभार्थ्यांना वितरित केलेल्या दिनांक ३१ मार्च,२००८ अखेरपर्यन्तची कर्जाची थकबाकी माफ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे सन २००९-१० च्या अतिरिक्त अर्थसंकल्पीय अधिवेशनाच्या अर्थसंकल्पीय भाषणात मा. वित्त मंत्री यांनी शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाच्या कर्जमाफीची घोषणा केली होती. त्यानुसार वित्त विभागाच्या मान्यतेने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** :- शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांचेमार्फत स्वयंरोजगारासाठी आदिवासी लाभार्थ्यांकरिता राबविण्यात येणा-या कर्ज योजनांसाठी राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली, राष्ट्रीयकृत बँका व शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळामार्फत उपलब्ध

करुन देण्यात आलेल्या आदिवासी लाभार्थ्यांकडील दिनांक १५ जानेवारी,१९९९ पासून ते दिनांक ३१ मार्च, २००८ अखेर थकित कर्ज व व्याजाची एकूण रक्कम रु. ३५९७.३१ लक्ष माफ करण्याचा निर्णय शासन घेत आहे.

२. उपरोक्त कर्जमाफीचा भाग म्हणून योजनांच्या अंमलबजावणीच्या प्रयोजनार्थ उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीच्या कर्जाची परतफेड करण्यासाठी राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली, राष्ट्रीयकृत बँका यांचे दिनांक ३१-३-२००८ अखेर थकित कर्ज व त्यावरील व्याजाबाबत त्यांच्याशी चर्चा व तडजोड करुन अनुज्ञेय असलेली थकित व व्याजाची रक्कम परत करण्यात यावी. यासाठी राज्य शासनाने शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास अनुज्ञेय होणारी रक्कम भाग भांडवलापोटी उपलब्ध करुन देईल. शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांनी वरील संस्थांना कर्ज फेडीची आवश्यक कार्यवाही करावी.

तसेच शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ यांचा योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्जिन मनी म्हणून वापरण्यात आलेल्या निधीची भरपाई म्हणून अनुज्ञेय होणारी रक्कम भाग भांडवलापोटी शासन महामंडळास यथावकाश उपलब्ध करुन देईल.

३. शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांचेमार्फत स्वयंरोजगारासाठी आदिवासी लाभार्थ्यांकरिता राबविण्यात आलेल्या कर्ज योजनांसाठी राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली, राष्ट्रीयकृत बँका व शबरी आदिवासी विकास महामंडळामार्फत दिनांक ३१ मार्च, २००८ अखेरपर्यन्त थकीत रक्कम रु. ३५९७.३१ लक्ष कर्ज व व्याज माफ केले असल्यामुळे सदर कर्जाची माफी दिल्याबाबतचा दाखला संबंधीत लाभार्थ्यांना देण्याची जबाबदारी शबरी आदिवासी वित्त विकास महामंडळ मर्या. नाशिक यांची राहील.

४. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली, राष्ट्रीयकृत बँका यांचे थकित असलेले कर्ज व व्याज माफ करण्याच्या अनुषंगाने चर्चा करुन तडजोड करण्यासाठी प्रधान सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| 1. प्रधान सचिव (वित्त) | : | अध्यक्ष |
| 2. प्रधान सचिव (नियोजन) | : | सदस्य |
| 3. प्रधान सचिव (सहकार) | : | सदस्य |
| 4. सचिव (रोजगार व स्वयंरोजगार) | : | सदस्य |
| 5. सचिव (पदुम) | : | सदस्य |
| 6. प्रधान सचिव (आदिवासी विकास) | : | सदस्य सचिव |

५. वरील समितीने राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली, राष्ट्रीयकृत बँकांच्या प्रतिनिधींसमवेत बैठक आयोजित करुन दिनांक ३१-३-२००८ अखेर थकित असलेले कर्ज व व्याजाबाबत तडजोड करुन अनुज्ञेय होणारी रक्कम संबंधितांना परत करण्यात यावी व यासाठी लागणारा आवश्यक निधी वरील अनुक्रमांक २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास भाग भांडवलापोटी शासन आदिवासी उपयोजनेच्या योजनातंर्गत निधीतून यथावकाश उपलब्ध करुन देईल.

६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३९२/व्यय-१४/०९, दिनांक १७/११/२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९१२०८१४२१२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सो.ना.बागुल)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव
सर्व संबंधित महामंडळांचे व्यवस्थापकिय संचालक
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या.. नाशिक.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र. १/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
वित्त विभाग ( साऊ) (व्यय-१४) मंत्रालय, मुंबई .३२.
नियोजन विभाग (का. १४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक, लेखापरिक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
क.अ. (का-१, ६ व ७), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का-३),आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

*****

HB/1678/09-10 - २८८ (७/१२)